# बेडूक उदास आहे





मैक्स, मराठी : अश्विनी बर्वे

# बेडूक उदास आहे



मैक्स, मराठी : अश्विनी बर्वे



बेडूक झोपेतून जागं झालं. त्याला खूप उदास वाटत होतं.



. . . बेडकाला रडू वाटत होतं. पण असं का होत होतं ते त्याला माहित नव्हतं.



त्यामुळे छोट्या अस्वलाला चिंता वाटू लागली. त्याला वाटे की बेडकाने खुश असायला हवं. “कृपा कर पण हस ना बेडका,” ते म्हणालं. “मी नाही हसू शकत,” बेडूक म्हणालं. “पण काल तर तू हसत होता,” छोट्या अस्वलाने म्हटले.

पण आज बेडूक हसलं नाही. आज ते खुश नव्हतं. तो आज जसा होता तसा राहू इच्छित होता. मग छोटं अस्वल तिथून निघून गेलं.





उंदीर आला, “जरा हस न बेडका,” तो म्हणाला.

“मी नाही हसू शकत,” बेडूक म्हणालं.

“पण आज खूप छान दिवस आहे!”उंदीर म्हणाला.

“तू आजारी तर नाही.”

“नाही,”बेडूक म्हणाले. “मी आजारी नाही,फक्त दुःखी आहे.”

“मी तुला हसवू का?” उंदराने विचारलं. आणि मग उंदीर वेड्यासारखा बेडकाच्या समोर नाचू लागला. पण त्याने बेडकाला हसू आलं नाही.





मग उंदीर आपल्या हातांच्या साहय्याने चालू लागला. पण त्यामुळेही बेडकाला हसू आले

मग उन्दिराने आपल्या नाकावर चेंडू ठेवून त्याचा तोल सांभाळू लागला. अगदी सर्कस मध्ये करतात ना तसे.



पण त्यानेपण बेडूक हसले नाही.

मग उंदीर खूप निराश झाला. त्याला समजत नव्हते की त्याने काय करावे ते. मग त्याच्या डोक्यात एक विचार आला.





उंदीर आपलं व्हायोलीन घेण्यासाठी घराकडे पळाला ....

... आणि त्याने परत येवून एक सुंदर धून वाजवली. ती धून एवढी सुंदर होती की बेडूक रडू लागले.ते रडत राहिले आणि त्याच्या गालावर आसू वाहू लागले..





उंदराने जितकं जास्त व्हायोलिन वाजवलं तितकं अधिक बेडूक रडू लागलं. “पण बेडका, तू का रडत आहे?” उंदराने विचारलं. “कारण की तू इतकं सुंदर व्हायोलिन वाजवत आहे.” बेडूक रडत म्हणाले. बेडूक खूप भावूक झालं होतं.

हे ऐकून उंदीर जोरात हसला. “तू फार मूर्ख आहे,बेडका,” तो म्हणाला. आणि मग उंदीर हसतच राहिला. बेडूक तिथच उभं राहिलं.





मग, अचानक बेडूक हसू लागलं.
त्याचं हसू सारखं वाढतच होतं...

...मग बेडूकपण हसू लागलं, गाऊ लागलं
आणि उंदराच्या बरोबर नाचू लागलं. आता
त्याचं सगळं दुःख दूर झालं.



त्या दोघांनी एवढा कल्हा केला की
तो ऐकून बदक पळत आले....



....आणि त्याबरोबर डुक्कर आणि ससा सुद्धा ....



...सगळ्यात शेवटी छोटं अस्वल आलं.मग ते सर्व एकमेकांच्या बरोबर हसत जमिनीवर पडले.

"अरे!" धापा टाकत बेडूक म्हणालं, “मी माझ्या पूर्ण जीवनात एवढा कधी हसलो नाही.”



"प्रिय बेडका," छोट्या अस्वलाने म्हटलं. “मला खूप आनंद आहे की तू परत हसू लागला आहे. पण हे सांग तू एवढा उदास का होता?” “मला नाही माहित," बेडूक म्हणाला. “मी फक्त दुःखी होतो.

समाप्त

